**उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिपत्याखाली असलेले "व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय" तसेच संबंधित मंत्रालयीन कार्यासने कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या अधिपत्याखाली आणण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
शासन निर्णय क्रमांक : कौविउ-२०१५/प्र.क्र.१९०/प्रशा-१
मंत्रालय, २ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०२ सप्टेंबर, २०१५.

**वाचा :-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एईओ-१०१५/प्र.क्र.०६/२०१५, दिनांक १५.१.२०१५
२) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन निर्णय क्र:-कौविउवि-२०१५/प्र.क्र.१२२/रोस्वरो-१, दि.०२.०९.२०१५.

**पार्श्वभूमी :**

कौशल्य विकास व उद्योजकता विभाग या नवनिर्मित विभागामार्फत राष्ट्रीय कौशल्य विकास कार्यक्रमाच्या अनुषंगाने "प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियान" राबविण्याबाबत उक्त संदर्भ क्र.२ अन्वये एक सविस्तर शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. या शासन निर्णयामधील परिच्छेद क्र.९.३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिपत्याखाली कार्यरत असलेले "व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय" मंजूर पदे व कार्यरत अधिकारी व कर्मचारी, अर्थसंकल्पिय तरतूदीसह तसेच संचालनालयाच्या आस्थापनेची कामे पाहणाऱ्या उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व संबंधित कार्यासने, मंजूर पदे व कार्यरत अधिकारी/कर्मचारी वर्ग, अर्थसंकल्पिय तरतूदीसह नवनिर्मित कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या अधिपत्याखाली आणण्याकरीता शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय" व त्यांच्या अधिनस्त कार्यालये, संस्था तसेच त्यांच्याशी संबंधित उच्च व तंत्र शिक्षण विभागातील संबंधित कार्यासने या विभागाच्या नियंत्रणाखाली आणण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. या मान्यतेनुसार सध्या उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिनस्त असलेली पुढील नमूद कार्यालये तसेच संबंधित कार्यासने कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या नियंत्रणाखाली येतील :-

**(अ)** व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई.

**(ब)** व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखाली कार्यरत असणाऱ्या पुढील नमूद संस्था :-

i) मुलभूत प्रशिक्षण व अनुषंगिक सूचना केंद्र (शासकीय व अशासकीय)
ii) व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ
iii) औद्योगिक शाळा
iv) यंत्र दुरुस्ती पथक

v) प्रगत प्रशिक्षण संस्था

vi) हायटेक प्रशिक्षण केंद्र

vii) औद्योगिक प्रशिक्षण संस्था, (शासकीय व अशासकीय)

viii) शासकीय तंत्र माध्यमिक शाळा (शासकीय, अशासकीय, अनुदानित, अशासकीय विना अनुदानित)

ix) द्विलक्षी +२ स्तरावरील संस्था (शासकीय, अशासकीय अनुदानित व अशासकीय विना अनुदानित )

x) उच्च माध्यमिक व्यवसाय शिक्षण (शासकीय, अशासकीय अनुदानित व अशासकीय विना अनुदानित)

**(क)** व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाशी संबंधित उच्च व तंत्र शिक्षण विभागामध्ये मंत्रालय स्तरावरील विषय हाताळणारी कार्यासने - व्यशि-१, व्यशि-२, व्यशि-३, व्यशि-४ व व्यशि-५

२. वरील परिच्छेदात नमूद केलेली व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई व त्यांच्या अधिनस्त असलेली सर्व कार्यालये व संस्था त्यांच्याकरिता मंजूर असलेल्या सर्व पदांसह तसेच कार्यरत असलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांसह या विभागाच्या नियंत्रणाखाली येतील. त्याचप्रमाणे सदर कार्यालये/संस्था याद्वारे राबविल्या जाणाऱ्या सर्व योजना या विभागाच्या नियंत्रणाखाली येतील.

३. उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडून या विभागाच्या अधिपत्याखालील कार्यासनांद्वारे हाताळले जाणारे विषय व कार्यासनात मंजूर कर्मचारी वर्ग यांचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे :-

| कार्यासनाचे नांव | विषय | कार्यासनातील मंजूर कर्मचारी वर्ग |
|---|---|---|
| व्यशि-१ | व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अंतर्गत गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांच्या आस्थापना तसेच सेवाविषयक बाबी | अवर सचिव-१<br>सहाय्यक - २<br>लिपिक-टंकलेखक - १ |
| व्यशि-२ | व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अंतर्गत बाबीसंदर्भात (अर्थसंकल्प विषयक बाबी, बांधकामाना मान्यता, बांधकामांसाठी जागा उपलब्ध करुन देणे, लेखा आक्षेप, भांडार पडताळणी इ. प्रकारची प्रकरणे हाताळणे.) | कार्यासन अधिकारी-१,<br>सहाय्यक - २<br>लिपिक-टंकलेखक - १ |
| व्यशि-३ | व्यवसाय प्रशिक्षण संचालनालयाच्या बाबीसंदर्भात (नवीन अभ्यासक्रम, तुकडया, नवीन संस्थांना मान्यता देणे, व्यवसाय प्रशिक्षणाशी संबंधित सर्व योजना) | अवर सचिव-१,<br>सहाय्यक - १<br>लिपिक-टंकलेखक - १ |
| व्यशि-४ | व्यवसाय शिक्षण संचालनालयाच्या अंतर्गत बाबीसंदर्भात (प्री एस.एस.सी. व्यवसायिक अभ्यासक्रम, +२ स्तरावरील व्यवसायिक अभ्यासक्रम, द्विलक्षी अभ्यासक्रम इ.बाबी ) | कार्यासन अधिकारी-१,<br>सहाय्यक - २<br>लिपिक-टंकलेखक - १ |

| | | |
|---|---|---|
| व्यशि-५ | जागतिक बँक प्रकल्प, VTP, PPP, MES, कौशल्य विकास इ. तसेच व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत येणाऱ्या गट-क आणि ड मधील कर्मचाऱ्यांच्या आस्थापना तसेच सेवा विषयक बाबी. | कार्यासन अधिकारी-१,<br>सहाय्यक - १<br>लिपिक-टंकलेखक - १ |
| वरील नमूद कार्यासनांचे पर्यवेक्षकीय कामकाज पाहणारे एक उपसचिव/सहसचिव संवर्गातील अधिकारी, त्यांचे स्वीय सहाय्यक, त्यांचे शिपाई तसेच ५ कार्यासनांचे कामकाज पाहण्याकरिता शिपाई संवर्गातील १ पद. | | |

४. उच्च व तंत्र शिक्षण विभागाद्वारे हाताळले जाणारे व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाशी संबंधित विषय या विभागाच्या नियंत्रणाखाली आल्यानंतर त्यानुसार या विभागाच्या विषयसूचीमध्ये महाराष्ट्र शासन कार्यनियमावलीच्या पहिल्या अनुसूचीमध्ये आवश्यक ते बदल करण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या रचना व कार्यपद्धती कक्षाकडे उचित प्रस्ताव या विभागाद्वारे सादर करण्यात येईल.

५. व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई तसेच त्यांच्या अधिनस्त सर्व कार्यालये/संस्था कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या नियंत्रणाखाली आल्यानंतर सदर कार्यालयाकरीता सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी उच्च व तंत्र शिक्षण विभागाद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या योजनांतर्गत व योजनेत्तर तरतुदीमधूनच व वेळप्रसंगी पुरवणी मागणीद्वारे अतिरिक्त तरतूद करुन सदर कार्यालयांचा सर्व खर्च या आर्थिक वर्षाअखेरपर्यंत (दि.३१/३/२०१६ पर्यंत) उच्च व तंत्र शिक्षण विभागाद्वारेच भागविण्यात यावा.

६. सदरचा शासन निर्णय निर्गमित झाल्यानंतर अर्थसंकल्प विषयक कामकाज हाताळणाऱ्या व्यशि-२ या कार्यासनाने व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई व त्यांच्या अधिनस्त कार्यालयांकरिता सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी योजनांतर्गत व योजनेत्तर अर्थसंकल्पीय तरतूद करण्याची कार्यवाही तातडीने सुरु करावी. त्याकरिता प्रस्तुतच्या कार्यालयांसाठी व त्या कार्यालयांद्वारे राबविल्या जाणाऱ्या योजनांसाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षापासून निधी अर्थसंकल्पित करण्यासाठी नवीन लेखाशिर्षे व उपशिर्षे कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या मुख्य शिर्षाखाली उघडण्याची कार्यवाही स्वतंत्ररित्या तातडीने सुरु करावी.

७. उक्त परिच्छेद क्र.३ येथे नमूद केल्यानुसार उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिनस्त असलेली सर्व कार्यासने कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या नियंत्रणाखाली आल्यानंतर सद्य:स्थितीत ती उच्च व तंत्र शिक्षण विभागामध्ये (मंत्रालय विस्तार इमारत, ४ था मजला) ज्याठिकाणी कार्यरत आहेत तेथेच त्यांच्याकडे असलेल्या सध्याच्या साधनसामुग्रीसह (जसे त्यांच्या वापरातील संगणक, प्रिंटर, दूरध्वनी, कपाटे, टेबल व खुर्च्या इत्यादीसह) कार्यरत राहतील. सदरहू कार्यासनातील संबंधित कर्मचाऱ्यांचे वेतन, भत्ते व अन्य अनुषंगिक खर्च तसेच सर्व प्रकारचे कार्यालयीन खर्च इत्यादीकरिता कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या अर्थसंकल्पामध्ये आवश्यक ती तरतूद झालेली नसल्याने या सर्वांवर यापुढे होणारा सर्व खर्च उच्च व तंत्र शिक्षण विभागानेच दिनांक ३१/०३/२०१६ पर्यंत त्यांच्या सन २०१५-१६ च्या मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीमधून तसेच, वेळप्रसंगी पुरवणी मागणीद्वारे अतिरिक्त तरतूद करुन भागवावा.

वरील बाबींकरिता कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पामध्ये आवश्यक ती तरतूद करण्याची कार्यवाही सुधारीत आठमाही अंदाजपत्रक सादर करतेवेळी विभागाच्या रोखशाखेने रोस्वरो-२ कार्यासनामार्फत तातडीने सुरु करावी.

८. सदरचा शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१०९/आस्था-१, दि.१२/०८/२०१५, नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.२७२/१४७१, दि.२८/०८/२०१५, सामान्य प्रशासन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.८५/२०१५/२२, दि.२९/०८/२०१५ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.६०९/व्यय-५, दि.०२/०९/२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०२१८२२५३२५०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santokh Singh Sandhu

Digitally signed by Santokh Singh Sandhu
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Principal Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Santokh Singh Sandhu
Date: 2015.09.02 18:29:30 +05'30'

( एस. एस. संधू)
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय , मुंबई
२. सर्व संबंधित मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय, मुंबई
३. मा.मुख्य सचिव , मंत्रालय , मुंबई
४. सर्व संबंधित मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव ,मंत्रालय , मुंबई.
५. महालेखापाल ( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई व महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास संस्था
९. आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
१०.सह सचिव/उप सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
११.सहसचिव/उप सचिव, कार्यासने व्यशि-१, व्यशि-२, व्यशि-३, व्यशि-४ व व्यशि-५ उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.सर्व विभागीय आयुक्त
१३.सर्व जिल्हाधिकारी
१४.आयुक्त, सर्व महानगर पालिका

१५.मुख्य अधिकारी, सर्व नगर परिषदा.
१६.संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य ,मुंबई
१७.संचालक (शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य ,मुंबई
१८.उपसंचालक, विभागीय मुख्यालय, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, मुंबई/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद /नाशिक
१९.विभागीय सहसंचालक/ उप संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, मुंबई/पुणे/ नागपूर/अमरावती/औरंगाबाद/ नाशिक
२०.सर्व कार्यासने, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
२१.निवड नस्ती